माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील
गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या
बदलीबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन आदेश क्र. संकीर्ण २०२३/६९३/प्र.क्र.१५४/का.३४अ**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २८ ऑगस्ट,२०२३

**वाचा:-** संचालक(माहिती)(प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक प्रविस्था-१२(२०२३)/विशेष बदली/का-१/२५१७, दिनांक २४.०८.२०२३

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्रधिकाऱ्यांच्या मान्यतेने आणि सदर अधिनियमातील कलम ४ (४) (दोन) आणि ४ (५) मधील तरतूदींनुसार माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील गट-ब संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिकारी यांची कामकाजाच्या व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने त्यांच्या नावासमोर स्तंभ ३ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पद व ठिकाण | बदलीनंतरचे पद व ठिकाण |
|---|---|---|---|
| | १ | २ | ३ |
| ०१. | श्रीमती अंजू निमसरकर | माहिती अधिकारी, महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली | माहिती अधिकारी, जिल्हा माहिती कार्यालय, बीड |

२. वरील अधिकारी यांना बदलीच्या पदावर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. तसेच, सदर अधिकारी यांनी त्यांच्या नावासमोर स्तंभ ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर तात्काळ रुजू होऊन आवश्यक अहवाल सर्व संबंधित कार्यालयांस तसेच शासनास विनाविलंब सादर करावा.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अधिकारी यांनी बदलीच्या पदस्थापनेत बदल करण्यासाठी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास त्यांच्या विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्याबाबतचा प्रस्ताव महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई यांनी शासनास सादर करावा.

४. बदली करण्यात आलेल्या उपरोक्त अधिकारी यांचे दि. ३१ ऑगस्ट, २०२३ पर्यंतचे वेतन हे सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाने काढावे व दि.१ सप्टेंबर, २०२३ पासूनचे वेतन बदलीने

पदस्थापना देण्यात आलेल्या कार्यालयाने काढावे. या संदर्भातील आवश्यक ती कार्यवाही संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८२८१७५४३३३७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RIMA SUBHASH DUTTAROY

Digitally signed by RIMA SUBHASH DUTTAROY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=487393c812e41c98e63a7a73c63e1d078da4c3c899b4307a07d4d99b40a7d635, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B813A4CECE1744D0527A20F20D15FC2FFC7D4457A8AE2120E0D35781B42C049C, cn=RIMA SUBHASH DUTTAROY
Date: 2023.08.28 17:57:49 +05'30'

**( रिमा दत्तरॉय )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
२. प्रधान सचिव (मावज), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
३.महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
४.महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परीक्षा), नागपूर,
५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
६. संचालक (माहिती), मराठवाडा विभाग, औरंगाबाद ,
७. उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
८. उपसंचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली
९. सर्व विभागीय माहिती कार्यालये,
१०. जिल्हा माहिती अधिकारी, जिल्हा माहिती कार्यालय, बीड,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड,
१२. श्रीमती अंजू निमसरकर, माहिती अधिकारी, महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली ( मावज मार्फत )
१३. सामान्य प्रशासन विभाग / ३४
१४. निवड नस्ती.